20200525194240681 9
२०५/५

लॉकडाऊन मधील कालावधीत मजुरांना व इतर नागरिकांना दयावयाच्या महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या एस.टी.बसेस मार्फत मोफत प्रवास करण्याची सुविधा देण्याबाबत .....

महाराष्ट्र शासन
महसुल व वन विभाग
शासन निर्णय, क्रमांक: डीएमयु-२०२०/प्र.क्र.९२/आव्यप्र-१
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २०.०५.२०२०

संदर्भ :१) शासन निर्णय,क्रमांक: डीएमयु-२०२०/प्र.क्र.९२/आव्यप्र-१, दिनांक :९.५.२०२०

२) शासन पुरकपत्र, क्रमांक: डीएमयु-२०२०/प्र.क्र.९२/आव्यप्र-१, दिनांक : ९.५.२०२०

**शासन निर्णय :**

लॉकडाऊन कालावधीत एस.टी.बसेस व्दारा प्रवास करण्यास संदर्भाधीन क्रमांक १ व २ येथील शासन आदेशान्वये परराज्यातून महाराष्ट्राच्या सीमेपर्यंत आलेल्या मजुरांना व इतर नागरिकांना त्यांच्या मूळगांवी पोहचविण्यासाठी व परराज्यातील अडकून पडलेल्या मजुरांना व इतर नागरिकांना राज्यांच्या सीमेपर्यंत सोडण्यासाठी एस.टी.बसेसचा वापर करून त्यापोटी होणारा खर्च राज्य शासनाच्या निधीमधून करण्यासाठी मान्यता देण्यात आली आहे.

२. सदर एस.टी. बस मोफत प्रवासाची सुविधा ही फक्त खालील व्यक्तींच्या बाबत अनुज्ञेय करण्यापुरतेच मर्यादित ठेवण्याच्या सुचना देण्यात याव्यात:

१) महाराष्ट्र राज्याच्या सीमेला लागून असलेल्या इतर राज्यातील जे मजूर व इतर नागरिक महाराष्ट्रात विविध ठिकाणी अडकलेले असतील त्यांना महाराष्ट्र राज्याच्या सिमेपर्यंत घेऊन जाण्यासाठी बसेसचा वापर करण्यात यावा. यानुसार गुजरात, कर्नाटक, गोवा, मध्यप्रदेश, तेलंगाणा, छत्तीसगड, आंध्रप्रदेश या राज्यांच्या संपर्क अधिकाऱ्यांना किंवा नजीकच्या जिल्हाधिकाऱ्यांना पूर्वसुचना देऊन त्या राज्याच्या सीमेपर्यंत त्यांना सोडण्यात यावेत.

२) वरील राज्यांव्यतिरिक्त इतर राज्यातील मजुरांना व इतर नागरिकांना ज्या ठिकाणावरुन श्रमिक रेल्वे त्या राज्यात जाण्यासाठी सोडण्यात येणार आहे त्या रेल्वे स्थानकापर्यंत नोंदणी केल्यानंतर एस.टी. बसेसने सोडण्यात यावे.

३) रस्त्याने चालत असलेले मजूर व इतर नागरिक आढळून आल्यास अशा मजुरांना व इतर नागरिकांना नजीकच्या निवारागृहामध्ये सोडण्यात यावे व त्यानंतर त्यांची नोंदणी

२८७/५५वे

केल्यानंतर त्यांना ज्या राज्यात जावयाचे आहे त्या राज्यात जाणारी श्रमिक रेल्वे जेथून सुटणार आहे त्या रेल्वे स्थानकापर्यंत एस.टी.बसेस व्दारा सोडण्यात यावे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

(अजोय मेहता)
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य.
५. मा.मंत्री / राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव.
६. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. सर्व विभागीय आयुक्त.
९. सर्व पोलीस आयुक्त/ पोलीस अधिक्षक.
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
११. सर्व जिल्हाधिकारी.
१२. प्रादेशिक परिवहन अधिकारी व उप प्रादेशिक परिवहन अधिकारी.
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१४. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर.
१५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१६. अधीदान व लेखा अधीकारी, मुंबई.
१७. मा. मंत्री(मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
१८. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
१९. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय, मुंबई.
२०. कार्यासन अधिकारी (म-११), मदत व पुनर्वसन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६), मंत्रालय, मुंबई.
२२. निवड नस्ती (कार्यासन- आव्यप्र-१).